अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या गट `ड`
संवर्गातील ६ `नाईक` पदे प्रादेशिक
कार्यालयाकडे वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक: इएसटी-१०१३/ प्र.क्र.१३९/का.१४२६,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१४

**वाचा** :- १) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.आरओडी-११०५/प्र.क्र.१६२/का.१४२६, दि. १८ मार्च, २००६

२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.ईएसटी-१०१३/प्र.क्र.१२५/का.१४२६, दि. १८ एप्रिल, २०१३

**प्रस्तावना :**

संदर्भाधीन अ.क्र.१ वरील शासन निर्णयान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील पदांचा आढावा घेण्यात येऊन सुधारित आकृतिबंध मंजूर करण्यात आला होता. सदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या मुख्यालय व क्षेत्रीय कार्यालयांसाठी एकूण ९७२ पदे मंजूर आहेत, त्यांपैकी ७२९ स्थायी पदे वजा जाता २४३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्यात आली होती.

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट `ड` संवर्गातील `नाईक` पदनामाची पदे ही पदोन्नतीने भरण्यात येतात, परंतु सदरहू पदे ही मुख्यालयातच मंजूर असल्याने, क्षेत्रीय कार्यालयातून `शिपाई` पदावरून पदोन्नत होऊन `नाईक` पदावर पदोन्नती स्वीकारण्यास कर्मचारी उत्सुक नसतात. त्यामुळे, आश्वासित प्रगती योजनेचाही लाभ सदर कर्मचारी घेऊ शकत नाहीत, ही वस्तुस्थिती विचारात घेऊन, मुख्यालयातील ६ (सहा) `नाईक` पदे संचालनालयाच्या प्रादेशिक कार्यालयात वर्ग करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या मुख्यालयातील गट `ड` संवर्गातील मंजूर असलेली ६ (सहा) `नाईक` पदे संचालनालयाच्या कोकण विभाग, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती व औरंगाबाद येथील प्रादेशिक कार्यालयांत वर्ग करण्यास, उक्त संवर्गाच्या पदोन्नती साखळीत कोणताही बदल होणार नसल्याच्या तसेच त्या संवर्गाच्या आरक्षण तसेच बिंदू नामावलीवर परिणाम होणार नसल्याच्या अटीच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त पदांच्या वेतन व भत्यावर होणारा खर्च हा “मागणी क्र.ओ-९-३४५४, गणना, सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी” याखाली संबंधित उपशिर्षांतर्गत खर्ची टाकून त्या-त्या वित्तीय वर्षीच्या **०१ वेतन** या उद्दिष्टाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५९१/का-१२, दि.२६/०८/२०१४ व १३/११/२०१४ आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.८१५, दि.१३/११/२०१४ अन्वये प्राप्त केलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०११७२७४०९२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Hirlekar Tushar P

Digitally signed by Hirlekar Tushar P
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hirlekar Tushar P
Date: 2014.12.01 17:35:42 +05'30'

( तु.पु.हिर्लेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी ,मुंबई / लेखा कोष भवन ,बांद्रा (पूर्व) ,मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती व औरंगाबाद.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती व औरंगाबाद.
९) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१०) लेखाधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११) कार्यासन अधिकारी (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी (का-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी (का-१४२७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (का-१४२६).